परळी वैजनाथ नगरपरिषद हद्दीतील
तीन रस्ते अवर्गीकृत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- रवियो-२०१७/प्र.क्र.६३/नियोजन-२**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.**
**दिनांक :- ३ मे, २०१७.**

**पहावे :-** १) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, उस्मानाबाद यांचे पत्र क्र.- जा.क्र./ओएसएम/पीडब्ल्यूसी/प्र.आ/२०५०/ दिनांक १९/०४/२०१७.

**प्रस्तावना :-**

बीड जिल्ह्यातील परळी शहरातून खर्डा - चौसाळा - साळेगांव - अंबाजोगाई -परळी (राज्यमार्ग क्र.६४) व खामगांव - मेहकर - तळणी -मंठा - देवगांव - सेलू - पाथ्री - परळी - पुस - बर्दापूर (राज्यमार्ग क्र.२२१) हे रस्ते जातात. या रस्त्यांपैकी राज्यमार्ग क्र.६४ ची साखळी क्र. ११२/०० ते ११६/४०० ( जिरेवाडी फाटा ते इटके चौक) एकूण लांबी ४.४०० कि.मी. व राज्यमार्ग क्र.२२१ ची साखळी क्र. २३२/६०० ते २३४/१०० (मौलाना आझाद चौक ते वैद्यनाथ मंदिर) एकूण लांबी १.५०० कि.मी परळी शहर हद्दीमध्ये येतात. सदर रस्ते अवर्गीकृत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,उस्मानाबाद यांचा प्रस्ताव तसेच नगरपरिषद परळी वैजनाथ यांची मागणी विचारात घेऊन,बीड जिल्ह्यातील परळी वैजनाथ नगरपरिषद हद्दीतील खालील रस्त्यांची लांबी अवर्गीकृत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | रवियो २००१-२१ नुसार रस्त्याचे नाव | अवर्गीकृत करावयाच्या रस्त्याची लांबी व साखळी क्रमांक | एकूण लांबी |
|---|---|---|---|
| १. | खर्डा - चौसाळा - साळेगांव - अंबाजोगाई - परळी (राज्यमार्ग क्र.६४) | जिरेवाडी फाटा ते इटके चौक ( कि.मी. ११२/०० ते ११६/४००) | ४.४० कि.मी. |
| २. | खामगांव - मेहकर - तळणी - मंठा - देवगांव - सेलू - पाथ्री - परळी - पुस -बर्दापूर (राज्यमार्ग क्र.२२१) | मौलाना आझाद चौक ते वैद्यनाथ मंदिर (कि.मी. २३२/६०० ते २३४/१००) | १.५०कि.मी. |
| | **एकूण** | | **५.९००कि.मी.** |

सदरचे रस्ते हस्तांतरीत केल्यानंतर बीड जिल्ह्यातील राज्यमार्गाची एकूण लांबी **१२६१.२५ कि.मी.** मध्ये **५.९० कि.मी.** ने घट होऊन एकूण लांबी **१२५५.३५** कि.मी. होईल.

उपरोक्त ५.९००कि.मी. लांबी अवर्गीकृत करण्यात येत आहे. तसेच सदर रस्त्याच्या देखभाल-दुरूस्तीचा खर्च नगरपरिषदेकडून करण्यात येईल व अवर्गीकृत केलेल्या रस्त्यावर होणाऱ्या देखभाल-दुरूस्ती करिता शासनामार्फत कोणतेही अतिरिक्त अनुदान देण्यात येणार नाही. या अटींच्या अधीन राहून सदर परळी वैजनाथ, नगरपरिषद हद्दीतून जाणाऱ्या राज्यमार्गांना अवर्गीकृत करण्यास शासन मान्यता देत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५०३१७३७१३९११८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2017.05.03 17:45:39 +05'30'

**(प्रशांत पाटील)**
अवर सचिव (नियोजन), महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
२) विभागीय आयुक्त,औरंगाबाद.
३) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, उस्मानाबाद (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करण्यात यावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
४) जिल्हाधिकारी, बीड.
५) मुख्याधिकारी, नगरपरिषद परळी वैजनाथ.
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अंबाजोगाई.
७) कार्यकारी अभियंता, (सा.बां.) जिल्हा परिषद, बीड.
८) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
९) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
१०) निवडनस्ती.